# || श्री व्याडेश्वर उपासना ||

श्रीगणेशाय नमः

## -: श्री व्याडेश्वर संक्षिप्त माहात्म्य :-

इ.स. १६३७ मध्ये श्री. विश्वनाथ हरी पित्रे यांनी संस्कृतात रचलेले 'श्री व्याडेश्वरोदयम' हे काव्य, 'श्री व्याडेश्वर महात्म्य' या नावे प्रकाशित झालेला त्याचा मराठी अनुवाद, पंडित दिवाकर घैसास यांची 'व्याडेश्वर (पंचायतन) उपासना' ही ओवीरूप रचना व श्री. श्रीकांत गोवंडे यांनी लिहिलेले 'श्री क्षेत्र व्याडेश्वर' हे पुस्तक एवढे साहित्य श्री व्याडेश्वराचे अनुषंगाने प्रसिद्ध झालेले आहे.

तरीही संपूर्ण 'श्री व्याडेश्वरोदयम' या काव्याचा मथितार्थ थोडक्यात साररूपाने सादर करावा असे मनात आल्यावर श्री व्याडेश्वरांच्या आशीर्वादाने मी खालील रचना केवळ ४२ अभंगांत शब्दबद्ध केली आहे. ती श्री व्याडेश्वर भक्तांना नक्कीच लाभदायक ठरेल व अतिशय थोडक्या शब्दात आणि थोडया वेळात संपूर्ण 'श्री व्याडेश्वरोदयम' या काव्याचे सारग्रहण करणे शक्य होईल अशी खात्री आहे. कृपया अभिप्राय कळवावा ही विनंती.

हे संक्षिप्त माहात्म्य वाचण्या अगोदर जर एकदा 'श्री व्याडेश्वरोदयम', 'बृहद् श्री व्याडेश्वर माहात्म्य' किंवा 'श्री क्षेत्र व्याडेश्वर' याचे वाचन केले तर सर्व संदर्भ नीट लागतील याची कृपया नोंद घ्यावी.

परशुरामांच्या | कोकण भूमीत | स्थाणुरूपे स्थित | गुहागरा ||१||
अनेक कुळांच्या | एक उद्धारका | नमन स्वीकारा | व्याडेश्वरा ||२||
घेतले आपण | इहलोकी रूप | क्षत्रिय संहारा | परशुरामा ||३||
साधिला आपण | अवतारहेतू | दान केली पृथ्वी | कश्यपाला ||४||
वस्तीच्या कारणे | केलीसे विनंती | हटावया मागे | सागराला ||५||
उन्मत्त जलधी | दुर्लक्षी तो आधी | नाकारी विनंती | हटण्याची ||६||
लावली प्रत्यंचा | सोडण्या तो तीर | शरण समुद्र | आला वेगे ||७||
तोडण्या तो दोर | आलीसे वाळवी | शापिली सोडली | कृपा केली ||८||
दिधले अभय | मोदे रत्नाकर | मागे सरकला | योजने सहा ||९||
अपरांत भूमी | अशी हि जन्मली | श्रावण वद्य | त्रयोदशीला ||१०||
शुक व सारण | सांगती हे वृत्त | ऐकुनी रावण | भयभीत ||११||
म्हणे अशा कृत्ये | पडेल उघडी | माझी लंकापुरी | भार्गवरामा ||१२||
ऐकुनिया स्तुती | होऊन संतुष्ट | दिधले अभय | दशानना ||१३||
अनेक देवता | ज्या होत्या बंदिस्त | जाहल्या निर्धास्त | लंकेमाजी ||१४||

स्थापन तयांचे | अपरांत क्षेत्री | म्हणती तयांना | कुलस्वामी ||१५||
परशुरामांची | पाहुनिया भक्ती | राहिला सांगाती | महादेव ||१६||
षडानन गौरी | साठ ते विप्रही | करिती वसती | गुहागरा ||१७||
तदनंतर त्या | व्याडी महर्षींनी | स्थापिले शिवलिंग | गुढग्रामी ||१८||
असुर मारण्या | राम अवतार | जग भयमुक्त | त्याने केले ||१९||
श्रीराम अवतारी | राम-भार्गव भेट | त्यायोगे रघुराज | धन्य झाला ||२०||
खलांच्या निःपाता | कृष्णजन्म झाला | भूलोक तारण्या | मेघश्याम ||२१||
श्रीकृष्णावतारी | गोमंतक निर्मिती | भार्गवे साधली | कृष्णायोगे ||२२||
कली अवतार | झाला त्यानंतर | त्रस्त चराचर | तयामुळे ||२३||
परशुपाणि ही | गुप्तच राहिला | रक्षित सर्वांना | महेंद्रगिरी ||२४||
महेश तेधवा | स्थाणुरूपे स्थित | व्याडेश्वर रूपी | सदोदित ||२५||
सागरकिनारी | भार्गवा दर्शन | देता प्रतिदिन | गौरीश्वरा ||२६||
सांकुरण काळी | पुनश्च प्रकट | धेनुयोगे झाला | व्याडेश्वर ||२७||
मंदिर बांधले | मोजून मापून | कापलेले पद | गांगडकाचे ||२८||
पंचायतन ते | नंतर स्थापले | मंदिर नटले | वैभवाने ||२९||
हनुमान सूर्य | विष्णू आणि दुर्गा | भक्तांना तारण्या | सदा सज्ज ||३०||
अनेक तीर्थे ती | बाजूस वसती | गरामठ आणि | वेळणेश ||३१||
टाळदेव आणि | तारकेश्वर तो | कार्तिक सोमेश | सप्तेश्वर ||३२||
कुटकेश्वर जो | सागराच्या तीरी | कर्णेश आणिक | क-हाटेश ||३३||
सप्तकोटीश्वर | कोटीतीर्थ तसे | पाताळी जो स्थित | हृदकेश ||३४||
दाभोळ नगरा | दाल्भ्येश्वर स्थित | शुक्लतीर्थी भैरव | हरिहर ||३५||
रामेश च्यवनेश | कनकेश गणेश | उष्ण जल कुंडे | ती अद्‌भुत ||३६||
श्रीधरे निर्मिले | गुहागर ग्राम | स्थापिली दुर्गाई | गजानन ||३७||
व्याडी महामुनी | स्थापित लिंगाते | केले वास्तव्याते | महादेवा ||३८||
आलो मी शरण | धरिले चरण | उद्धार कारण | सर्वेश्वरा ||३९||
केली ही विनंती | देणे त्या सद्गती | आपुल्याया हाती | शम्भूदेवा ||४०||
करी हे संक्षिप्त | व्याडेश वर्णन | मोडक गिरीश | सुधीर सुत ||४१||
कृपादृष्टी राहो | तुमची आम्हावर | देवा व्याडेश्वर | सदोदित ||४२||

## -: श्री व्याडेश्वर आरती :-

पारंपारिक आरत्यांच्या चालीवर आजपावेतो श्री व्याडेश्वराची आरती बहुधा उपलब्ध नव्हती. अचानक एक दिवस मला जी आरती सुचली ती मी येथे देत आहे. कर्ता करविता श्री व्याडेश्वर असून मी केवळ निमित्तमात्र. त्याने मला माध्यम म्हणून स्वीकारले हे माझे अहोभाग्यंच होय.

शंकराचा श्री व्याडेश्वररूपी अवतार, त्याचे पंचायतन पद्धतीतले मंदिर आणि गाभाऱ्यातील श्रींची पिंडी यांचे पूर्ण वर्णन सदर रचनेत समाविष्ट झालेले आहे.

भार्गवनिर्मित पावन अपरांत भूमी |
त्यामाजी अवतरला जगताचा स्वामी ||
व्याडी स्थापित लिंगे गुप्तची राहिला |
शरणागत जे भाविक तारित त्यां सकळा ||१||

जयदेव जयदेव श्री व्याडेश्वरा, प्रणिपात साष्टांग तुज गंगाधरा || धृ ||

अंबामाता आणिक शोभे गणपती |
गरुडासह मारुती नंदी तो पुढती ||
श्रीपती लक्ष्मी सूर्य भवती बैसले |
पंचायतन रूपे मंदिर शोभले || २ ||

जयदेव जयदेव श्री व्याडेश्वरा, प्रणिपात साष्टांग तुज गंगाधरा || धृ ||

सात्विक तो गाभारा पिंडी तव त्यात |
सप्त वदनी फणिधर धरतो वरि छत्र ||
संतत धार धराया अभिषेक पात्र |
ध्यानचि सुंदर दिसले गिरीशा सुपात्र || ३ ||

जयदेव जयदेव श्री व्याडेश्वरा, प्रणिपात साष्टांग तुज गंगाधरा || धृ ||

- © गिरीश सुधीर मोडक

## -: श्री व्याडेश्वराचे श्लोक (चाल: मनाचे श्लोक) :-

गुणातीत जो पुत्र हा शंकराचा |
उमेच्या उटीतून ही जन्म ज्याचा ||
गणांचा पती अंतरी तो भजावा |
स्मरोनि तया गाऊ व्याडेश काव्या || १ ||

जगी जीवनी व्याप हा फार झाला |
प्रभो तार तू आज ह्या पामराला ||
अप S रांत प्रांतात जे गुह्य ग्राम |
शिवाचे असे ते खरे पूर्ण धाम || २ ||

धरित्रीवरी स्वर्ग ह्या गुह्यग्रामी |
वसे तोहि व्याडेश ज्या पुण्यधामी ||
तया दर्शने ह्या मनी हर्ष झाला |
अती कष्टि जो जीव तो धन्य झाला || ३ ||

शिरी वाहतो जो कुळांचाहि भार |
असा तोचि व्याडेश कनवाळू फार ||
मुखी सर्वदा नाम व्याडेश्वराचे |
करी भस्म त्या सर्वही पातकांचे || ४ ||

जयाचे मनी वास व्याडेश्वराचा |
उणे ना  तया तोहि परिपूर्ण साचा ||
सदा अंतरी पिंडी व्याडेश्वराची |
झणी देई अनुभूती परमामृताची || ५ ||

तुझा जो धरी आदरे नित्य ध्यास |
तयाचे वरी हो तुझी मर्जी खास ||
तुवा पाहता होई उद्धार ज्याचा |
जगी धन्य तो दास व्याडेश्वराचा || ६ ||

जरी स्थाणुरूपे तुझा सत्य वास |
प्रचीती तुझी येई शरणागतास ||
कटाक्षे तुझ्या जन्म परिपूर्ण ज्याचा |
जगी धन्य तो दास व्याडेश्वराचा || ७ ||

जरी अमृताचे परी तीर्थ ह्याचे
प्रसादातही सार भुवनत्रयीचे
तया भक्षिता होई उद्धार ज्याचा
जगी धन्य तो दास व्याडेश्वराचा || ८ ||

मना अंतरी ध्यान व्याडेश्वराचे
सदा वैखरी नाम व्याडेश्वराचे
तया पूजिता जन्म कृतार्थ ज्याचा
जगी धन्य तो दास व्याडेश्वराचा || ९ ||

तुझे रूप साक्षात आनंददायी
सुखाचीही अनुभूती तुझ्याच ठायी
ठरे सार्थकी जन्म शरणागताचा
जगी धन्य तो दास व्याडेश्वराचा || १० ||

अती शांत प्राकार व्याडेश्वराचे
तिथे अंतरी नित्य ॐ कार गाजे
गिरीशा मनी ध्यास तुझ्या रुपाचा
जगी धन्य तो दास व्याडेश्वराचा || ११ ||

- © गिरीश सुधीर मोडक

## -: श्री व्याडेश्वर कृपाकवच ( मराठी ) :-

वेदाचार्य दिवाकर अनंत घैसास गुरुजी यांनी संस्कृत भाषेत श्री व्याडेश्वर कृपाकवच नावाने एक कवन केले आहे. श्रीरामरक्षेप्रमाणे या रचनेतही श्री व्याडेश्वरास संपूर्ण शरीराचे रक्षण करण्याविषयी प्रार्थना केलेली असून त्यात बरेच शब्द संधीरूपाने आले आहेत.

सर्वसामान्यांना समजण्यास सोपे जावे या हेतूने भक्त गिरीश सुधीर मोडक यांचेकडून श्रींचे आशीर्वादाने घडलेले त्याचे मराठी भाषांतर खाली देत आहे. अनुवाद करताना संधीविग्रह झाल्यामुळे संस्कृत श्लोकांतील ओळी मराठीमध्ये विस्तृत स्वरुपात आल्या आहेत. चालीच्या अनुषंगाने रक्षाविनंतीच्या मूळ १८ श्लोकांचे मराठीत ३६ अभंग अथवा एकूण २१ संस्कृत श्लोकांचे मराठीत ४२ अभंग झाले आहेत. तसेच भाषांतरामुळे सदर रचनेची बांधणी थोडी सैल झाली असून अभंगाची चाल लागू होण्याकरिता घेण्यात आलेले स्वातंत्र्य, थोडी शिथिलता जाणविण्याची शक्यता आहे. त्यामुळे प्रत्येक ओळीत अगदी तंतोतंत अथवा शब्दशः समानता असेलच असे नाही परंतू मथितार्थ किंवा गोषवारा बहुतेक श्लोकांमध्ये उतरलेला जाणवेल अशी खात्री आहे.

एक संस्कृत श्लोक आणि त्याखाली त्याचा मराठीमधील अर्थ अंतर्भूत असलेले दोन अभंग अश्या क्रमाने सदर रचना पुढीलप्रमाणे :-

श्रीगणेशाय नमः

गुहागरस्थितः साक्षान्महाव्याडेश्वरः शिवः ।
पातु मां सङ्कटात्सत्यं शरणागतवत्सलः ॥०१॥

गुहागरामध्ये | वसे तो साक्षात | व्याडेश्वर रूपी | शिव शंभू || ०१ ||
संकटामधून | रक्षावे मजसी | तारणहार तू | एक प्रभू || ०२ ||

स मामवतु दुर्भिक्षे सुखे दुःखे दिने दिने ।
परिवारं सदा पातु सदनं त्रिपुरान्तकः ॥०२॥

दिसामाजी येता | सुख किंवा दुःख | दुष्काळातही तू | रक्षी मज || ०३ ||
त्रिपुरान्तक तू | रक्षावे आमुचे | कुटुंब आणखी | घरदार || ०४ ||

मम चेतश्च बुद्धिं च धूर्जटी पातु मे मनः ।
वृत्तिं पातु पिनाकी मे व्यवसायं जटाधरः ॥०३॥

माझी बुद्धी आणि | चेतना व मन | धूर्जटी रूपाने | रक्षावे तू || ०५ ||
वृत्ती तू रक्षावी | पिनाकी रूपाने | व्यवसाय रक्षी | जटाधर || ०६ ||

भूमौ तथा पितृलोके लोकनाथः सदाशिवः ।
स्वर्गे रक्षतु सर्वेशो महादेवश्च सर्वदा ॥०४॥

भूमिलोकी आणि | पितृलोकातही | रक्षण करी तो | सदाशिव ||०७||
सर्वेश रक्षी तो | स्वर्ग लोकामाजी | रक्षी सदा तोचि | महादेव ||०८||

शीर्षं मे शङ्करः पातु भालं रक्षतु वै भवः ।
नेत्रौ दृष्टिं नीलकण्ठः श्रुतिं भूतेश्वरस्तथा ॥०५॥

मस्तक रक्षण | करतो शंकर | भाल प्रदेश तो | रक्षी भव ||०९||
नीलकंठ रक्षी | नेत्र आणि दृष्टी| श्रुती तो रक्षितो | भूतेश्वर ||१०||

भार्गवस्थापितः स्थाणुर्मस्तकं मे सदाऽवतु ।
घ्राणं मृत्युञ्जयः पातु मुखं कोङ्कणरक्षकः ॥०६॥

भार्गवस्थापित | स्थाणुरूपामध्ये | मस्तक रक्षण | सदा करी ||११||
मृत्युन्जय करी | नासिका रक्षण | कोकण रक्षक | रक्षी मुख ||१२||

ओष्ठौ वाणी च जिह्वां च रक्षतां चन्द्रशेखरः ।
कन्धरामीश्वरः पातु भुजौ पञ्चाननस्तथा ॥०७॥

चंद्रशेखर तो | करितो रक्षण | ओठ वाचा जीभ | तिन्हींचेही ||१३||
कंठाचे रक्षण | करी रामीश्वर | पंचानन रक्षी | दंड दोन्ही ||१४||

स्कन्धौ महेश्वरः पातु करौ मे शैलजापतिः ।
हस्तौ रक्षेदाशुतोषो विश्वनाथः कराङ्गुलीः ॥०८॥

महेश्वर रक्षी | दोन्ही खांदे नित्य | शैलजापती तो | रक्षी कर ||१५ ||
आशुतोष करी | हातांचे रक्षण | बोटे रक्षी तथा | विश्वनाथ ||१६||

भस्मधारी करपृष्ठे शूली करतले तथा ।
हृदयं पातु योगीशः उरो मे पार्वतीप्रियः ॥०९॥

कर पृष्ठांना तो | भस्मधारी रक्षी | करतल रक्षी | शूली नित्य ||१७||
योगीश करतो | हृदय रक्षण | पार्वतीप्रिय तो | रक्षी ऊर ||१८||

जठरं हव्यवाण्नेत्रो नाभिं भक्तमनोगतः ।
स्मरान्तकः कटी पातु सक्थिनी विमलान्तरः ॥१०॥

हव्यवाणनेत्र | रक्षितो उदर | भक्तमनोगत | नाभी रक्षी ||१९||
स्मरान्तक करी | कटीचे रक्षण | विमलांतर तो | सक्थिनीचे ||२०||

गुहग्रामेश्वरः पातु जङ्घे ऊरू च गुह्यकम् ।
जानुनी स्थाणुरूपेण रक्षेन्मम पुरान्तकः ॥११॥

गुहग्रामेश्वर | करी तो रक्षण | मांड्या पाय दोन्ही | समूहाचे ||२१||
जानुनी रक्षण | स्थाणुरूप करी | पुरान्तक रक्षी | सर्व देह ||२२||

गुल्फ गुहपिता रक्षेच्चरणौ कुलदैवतम् ।
सर्वाङ्गाणि विभू रक्षेत् त्वग्रक्षेद्भयनाशनः ॥१२॥

घोट्याचे रक्षण | गुहपिता करी | पाऊले तो रक्षी | कुलदेव ||२३||
विभू तो रक्षितो | सर्व देहालाही | भयनाशन तो | तारी त्वचा ||२४||

धर्मं मेऽवतु संहर्ता कर्म रक्षेत्पिनाकवान् ।
पुण्यं मे पातु काशीशो धैर्यं रक्षतु वै हरः ॥१३॥

धर्म माझा सदा | संहर्ता तो रक्षी | पिनाकवान ही | रक्षी कर्म ||२५||
काशीविश्वनाथ | पुण्य देई मज | धैर्य माझे सदा | रक्षी हर ||२६||

रुद्रो मे सन्ततिं पातु पशून्पशुपतिस्तथा ।
वाहनं सर्वगः शम्भुः शीलं त्र्यम्बकवैभवः ॥१४॥

रुद्र तो करतो | संतती रक्षण | पशू रक्षी तोही | पशुपति ||२७||
वाहन रक्षण | शंभू सदा करी | त्र्यंबक वैभव | शील रक्षी ||२८||

वर्त्म कैलासनाथश्च पातु मे कुलदैवतम् ।
सम्पदं साम्ब आनन्दं पातु नर्तनपण्डितः ॥१५॥

कैलासनाथ तो | पथ रक्षी माझे | कुलदैवत तो | रक्षी मज ||२९||
सांब तो रक्षितो | संपत्ती ही माझी | नर्तनपंडित | मोद रक्षी ||३०||

सर्वस्थानेषु कालेषु रक्षेन्मां गिरिजापतिः ।
कवचस्मरणेनैव पातु व्याडेश्वरः स्वयम् ॥१६॥

गिरिजापती तो | सर्व स्थान रक्षी | काळालाही माझ्या | रक्षी तोचि ||३१||
करिता केवळ | कवच स्मरण | करितो रक्षण | व्याडेश्वर ||३२||

प्रभाते वा प्रदोषे वा दिने रात्र्यां पठेन्नरः ।
विघ्नानि तस्य नश्येयुः सर्वदा सुखभाग्भवेत् ॥१७॥

प्रभात समयी | प्रदोषाचे वेळी | दिवसा वा रात्री | म्हणे कोणी ||३३||
विघ्ने सारी त्याची | नाश ही पावती | सदा सर्वदा तो | होई सुखी ||३४||

अरुणोदयकाले वा जपेद्दीपकसन्निधौ ।
अमोघं कवचं भूयात्प्रज्ञाङ्कुरप्रवर्तनम् ॥१८॥

सूर्योदया वेळी | किंवा संध्याकाळी | म्हणावे हे स्तोत्र | पुण्यप्रद ||३५||
अमोघ ठरेल | ऐसे हे कवच | बुद्धिप्रद असे | सुनिश्चित ||३६||

अष्टादशेषु लोकेषु रक्षां व्याडेश्वरकृताम् ।
प्राप्य भक्तो भवेन्नित्यं सदा शिवकृपाङ्कितः ॥१९॥

छत्तीस अभंग | म्हणता सत्वर | रक्षी सदा तोचि | व्याडेश्वर ||३७||
जोडुनिया पुण्य | उद्धरितो भक्त | होई त्याचेवर | शिवकृपा ||३८||

ध्यायेद्व्याडेश्वरं नित्यं जपेन्नाम शिवस्य च ।
सद्धर्मकर्मसंयुक्तः सदाचारी सुखी भवेत् ॥२०॥

व्याडेश्वर ध्यान | नित्य नियमाने | शिवनाम जप | करील जो ||३९||
कर्म धर्म त्याचे | ठरती निर्मळ | सदाचारी तोचि | होई सुखी ||४०||

एतत्तु कवचं श्रद्धाभक्तियुक्तेन चेतसा ।
दिवाकरकविप्राप्तं हृदयानन्दकारणम् ॥२१॥

दिवाकर कवी | भक्ती श्रद्धा युक्त | भाव ठेउनिया | काव्य करी ||४१||
मोडक गिरीश | सुधीर नीलिमा | सुत तया आणी | स्वभाषेत ||४२||

इति श्रीअनन्तसुत-श्रीदिवाकरविरचितं श्रीव्याडेश्वरकृपाकवचं सम्पूर्णम् ॥

येथे श्री अनंतसुत दिवाकर (घैसास) यांनी (संस्कृत भाषेत) लिहिलेले आणि सुधीर नीलिमासुत गिरीश मोडक यांनी श्री व्याडेश्वरकृपेने मराठीमध्ये आणलेले श्री व्याडेश्वरकृपाकवच संपूर्ण झाले.

ॐ ह्रीं श्री व्याडेश्वराय नमः ।

- © गिरीश सुधीर मोडक / ७९७२४१०३१० / ९४२०८६१७४५ / gsmodak@gmail.com

(वाचकांनी कृपया वरील संपर्क क्रमांकांवर अथवा ई-मेल द्वारा अभिप्राय जरूर कळवावा.)